**महाराष्ट्र शासन**

क्र.सकआ २०२०/प्र.क्र.१११/आस्था-२,
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २६ ऑक्टोबर, २०२१.

**आदेश**

या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील समाज कल्याण अधिकारी व तत्सम गट-ब (सहाव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी रु.९३००-३४८००, ग्रेड पे रु.४४००) या संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण व तत्सम गट-अ (सहाव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी रु.९३००-३४८००, ग्रेड पे रु.५०००) या संवर्गात परिच्छेद २ मध्ये नमूद अटींच्या अधिन राहुन, तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर रकाना ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे.

| क्र | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या कार्यरत असलेले ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. पियुष चव्हाण | संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, अकोला | जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ या रिक्त पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे. |
| २ | श्री. वाय.एस.पाटील | समाज कल्याण अधिकारी, गट-ब, सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचे कार्यालय, जळगाव | तुर्त जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक या रिक्त पदावर तद्नंतर संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, नाशिक श्रीमती प्राची वाजे यांच्या पदोन्नतीनंतर रिक्त होणाऱ्या पदावर |
| ३ | श्री. आर.एच.एडके, | विशेष अधिकारी (शानिशा), गट-ब, सहाय्यक आयुक्त समाज कल्याण यांचे कार्यालय, लातूर. | जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली या रिक्त पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे. |
| ४ | श्रीमती जी.डी.गुट्टे | संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, हिंगोली | सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, परभणी या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे. |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | श्री. एस.एन.चिकुर्ते (दिव्यांग- अल्पदृष्टी) | समाज कल्याण अधिकारी, गट-ब, सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचे कार्यालय, लातूर | सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, लातूर या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे. |
| ६ | श्री.वाय.पी.पाटील | समाज कल्याण अधिकारी, गट-ब, प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण यांचे कार्यालय, मुंबई | सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, जळगाव या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे. |
| ७ | श्रीमती एस.व्ही.तेलगोटे | समाज कल्याण अधिकारी, गट-ब, सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांचे कार्यालय, नागपूर | सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, भंडारा या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे. |
| ८ | श्री.एस.व्ही.आऊलवार | संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, लातूर | संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, लातूर |

२. अटी व शर्ती:-

१) मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात आली आहे. तसेच, दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सामान्य प्रशासन विभागाने सदर सहमती दिलेली आहे. यानुसार सदर पदोन्नत्या करण्यात येत आहेत.

२) सदर आदेशान्वये देण्यात येत असलेल्या पदोन्नत्या मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मुळ अर्ज क्र.२२६/२०१९ प्रकरणी मा.न्यायाधिकरणाच्या निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहेत.

३) सदर पदोन्नत्या तात्पुरत्या स्वरूपाच्या असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी सदर अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि.२२.०७.२०२१ रोजीच्या निर्णयानुसार दिव्यांग आरक्षणासह पदोन्नतीसाठीची सर्व रिक्त पदे सा.प्र.वि. /१६-अ यांनीदि.०५.०७.२०२१ रोजीचा शासन निर्णय व दिनांक २३.०७.२०२१ च्या शासन पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे.

३. वरील सर्व संबधित अधिकाऱ्यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरिता आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी त्यांचेकडील कार्यभार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे.

४. प्रस्तुत शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२११०२६१७३९४१६४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2021.10.26 17:41:56 +05'30'

(वि.पु.घोडके)
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबधित अधिकारी (व्दारा :- आयुक्त, समाज कल्याण, पुणे)

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२. आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे
३. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
४. महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
५. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण
६. सर्व उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती
७. मा. मंत्री/मा. राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
८. मा.अपर मुख्य सचिव (सा.न्या.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
९. मा.प्रधान सचिव (इ.मा.बहुजन कल्याण विकास विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१३.आस्था -२ निवडनस्ती